साखर कारखान्यास ऊस पुरविणा-या शेतक-यांच्या एफआरपीची रक्कम अदा करण्यासाठी दीर्घ मुदतीचे कर्ज उपलब्ध करुन देण्याबाबत- व्याज अनुदान.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन शुध्दीपत्रक क्रमांक: ससाका २०१५/प्र.क्र.२२६/३-स
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०००३२,
दिनांक : २८ सप्टेंबर, २०१५

वाचा:- १) भारत सरकार ,खाद्य व सार्वजनिक वितरण विभाग, नवी दिल्ली विभागाची अधिसूचना क्रमांक १(५)/२०१५/एस.पी.I, दिनांक २३.६.२०१५.
२) शासन निर्णय क्रमांक ससाका २०१५/प्र.क्र.२२६/३-स, दिनांक ३०.०७.२०१५.
३) साखर आयुक्त, साखर संचालनालय, शिवाजीनगर, पुणे यांची दिनांक १३.०८.२०१५, दिनांक ०८.०९.२०१५ व दिनांक १५.०९.२०१५ ची पत्रे.
४) शासन निर्णय शुद्धिपत्रक क्रमांक ससाका २०१५/प्र.क्र.२२६/३-स, दिनांक ०१.०८.२०१५.

शुध्दीपत्रक:-

उपरोक्त शासन निर्णय दिनांक ३०.०७.२०१५ अन्वये साखर कारखान्यास ऊस पुरविणा-या शेतक-यांच्या एफआरपीची रक्कम अदा करण्यासाठी दीर्घ मुदतीचे कर्ज उपलब्ध करुन देण्याबाबत- व्याज अनुदान मंजूर करणे याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयान्वये एकूण १४७ साखर कारखाने पात्र ठरत असल्याचे आदेश निर्गमित करण्यात आलेले होते. **सदर शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.**

१)सदर शासन निर्णयातील जोडपत्र १ मधील अनुक्रमांक १८ "महाडीक शुगर्स लि. ता. राधानगरी, जि. कोल्हापूर" या कारखान्याने दिनांक ३० जून, २०१५ अखेर एफआरपीची रक्कम ५०% दिली नसल्याने सदर कारखाना अपात्र ठरत आहे, तो वगळण्यात येत आहे.

२) "श्रीराम जवाहर शेतकरी सहकारी साखर उद्योग लि., फलटण, जि.सातारा व साईबाबा शुगर्स लि., औसा, जि.लातूर" यांनी दिनांक ३०.६.२०१५ पर्यंत एफआरपीची रक्कम ५०%पेक्षा जास्त दिली असल्याने जोडपत्र-१ मध्ये सदर कारखान्याचा समावेश करण्यात येत आहे. यामुळे आता पात्र कारखान्यांची संख्या १४८ होत आहे.

३) सदर शासन निर्णयातील जोडपत्र-१ मधील अनुक्रमांक ७४ वरील "**सिद्धेश्वर** शुगर्स लि., ता.उत्तर सोलापूर, जि. सोलापूर" याऐवजी "**सिध्दनाथ** शुगर मिल्स लि., ति-हे, ता.उत्तर सोलापूर, जि. सोलापूर" असे वाचावे.

४) जोडपत्र-२ मधील अनुक्रमांक १ वरील "ब्रिक्स फॅसिलिटीज प्रा. लि. संचालित आ. नलवडे गडहिंग्लज ससाका लि.जि. कोल्हापूर" व अनुक्रमांक २ वरील "श्री.तात्यासाहेब कोरे वारणा ससाका लि. जि. कोल्हापूर" हे दोन कारखाने एनपीएच्या यादीमधून वगळून जोडपत्र-१ च्या यादीमध्ये त्यांचा समावेश करण्यात येत आहे.

२. सदर शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०९२८११५८१५९८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr Sudin Popat Gaikwad

Digitally signed by Dr Sudin Popat Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8ff188a569f4a95d2f0ce8ca61e60d8aa5f51a1bf65b42dd49bb26d165941d9e, cn=Dr Sudin Popat Gaikwad
Date: 2015.09.28 16:44:09 +05'30'

**( डॉ.सुदिन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२.मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
३.मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
४.मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५.मा. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
६.प्रधान महालेखाकार ( लेखापरिक्षा-१)/ (लेखा व अनुज्ञेयता-१) महाराष्ट्र राज्य, मुंबई
७.प्रधान महालेखाकार ( लेखापरिक्षा-२)/ ( लेखा व अनुज्ञेयता-२) महाराष्ट्र राज्य, नागपूर
८.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
९.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
१२.सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांनी वरील आदेश त्यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व साखर कारखान्यांच्या निदर्शनास आणावेत.
१३.जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१४.वित्त विभाग व्यय-२/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१७.अध्यक्ष/कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी बँक मर्या., मुंबई
१८.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ म., नरीमन पॉईंट-मुंबई
१९.कार्यासन क्रमांक १६-स/१७-स/२५-स/२२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०.३-स संग्रहार्थ

******************